**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१७/प्र.क्र.३९/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २३ मे, २०१७

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) अनुसार खाली नमूद केलेल्या मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखकांची आंतरविभागीय बदली करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | श्री / श्रीमती | लिपिक-टंकलेखकाचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | नि.अ.चांदोरकर | सामान्य प्रशासन | गृह |
| २ | श्री | अ.श.निकम | नगर विकास | अल्पसंख्याक विकास |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता सर्व मंत्रालयीन विभागांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर सर्व विभागांनी पर्यायी कर्मचारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या कर्मचाऱ्यांना दिनांक १.६.२०१७ (म.पू.) रोजी कार्यमुक्त करावे.

२) बदली झालेले कर्मचारी त्यांच्या संबंधित विभागातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या कर्मचाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्याला जबाबदार धरण्यात येईल.

३) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही कर्मचाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

४) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व कर्मचाऱ्यांचे दिनांक ३१.५.२०१७ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. दिनांक १.६.२०१७ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या विभागाकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित कर्मचारी बदलीच्या विभागात हजर झाल्यानंतर बदलीनंतरच्या विभागाने काढावे व तसा अहवाल सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. दिनांक १.६.२०१७ पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल अशा सूचना सर्व प्रशासकीय विभागांना देण्यात येत आहेत. तसेच बदली केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांचे दिनांक ३१.५.२०१७ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने अदा करावयाचे असून, दिनांक १.६.२०१७ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे असल्याबाबत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनाही कळविण्यात येत आहे.

३. विभागाने बदली झालेल्या कर्मचाऱ्यांना दिनांक ३१-०५-२०१७ (म.नं.) कार्यमुक्त न केल्यास शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/का-१४, दिनांक २३ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार सामान्य प्रशासन विभागाकडून कार्यवाही करण्यात येईल याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार बदलीनंतरच्या प्रशिक्षणाची कार्यवाही करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्रमांक: कआनि १११६/प्र.क्र.३२/१४-ब, दिनांक २३ मे, २०१६ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार विभागात बदलीने रुजू झालेल्या कर्मचाऱ्यांना बदलीनंतरचे प्रशिक्षण संबंधित मंत्रालयीन विभागांनी आयोजित करावे.

५. बदली झालेल्या लिपिक-टंकलेखकांना संबंधित विभागाने कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच बदली झालेल्या लिपिक-टंकलेखकांनी त्यांची पदस्थापना केलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०५२३१७३६३६८००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.05.23 17:47:12 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित लिपिक-टंकलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
३. सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
४. आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग,

(संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांना दिनांक १.६.२०१७ (म.पू.) रोजी कार्यमुक्त करणे अत्यावश्यक असून, कार्यमुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांचे दिनांक ३१.५.२०१७ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. दिनांक १.६.२०१७ पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी अदा केल्यास त्यांना याबाबत व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल व त्यांच्याविरुध्द नियमानुसार योग्य ती कारवाई करण्यात येईल.

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व कर्मचाऱ्यांचे दिनांक ३१.५.२०१७ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. दिनांक १.६.२०१७ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन १४-अ)